समग्र शिक्षा (प्राथमिक शिक्षण) कार्यक्रमासाठी Ad-hoc हप्त्याचा अनुसूचित जमाती (TSP) उप योजनेचा निधी वितरीत करणेबाबत (केंद्र व राज्य हिस्सा).

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसएसए-२०२०/प्र.क्र.१११ भाग-३/एस.डी-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ०३ नोव्हेंबर, २०२०

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६/०४/२०२०

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.०४/०५/२०२०

३) केंद्र शासन, मनुष्यबळ विकास मंत्रालय, नवी दिल्ली आदेश क्रमांक: F.No-७-२/२०२०-IS-१२(ST), दि.०५/०८/२०२०

४) महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे पत्र क्र.मप्राशिप/लेखा-२/Ad-Hoc./REC/(Gen.,SC,ST)निधी मागणी/२०२०-२१/१८५३, दि.१५/०९/२०२०

५) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.बीयुडी-२०२०/प्र.क्र.०४/कार्यासन-६, दि.२८/१०/२०२०

**प्रस्तावना:-**

समग्र शिक्षा (प्राथमिक शिक्षण) योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण (केंद्र : राज्य) ६०:४० असे आहे. केंद्र शासनाने दिनांक ०५/०८/२०२० रोजीच्या आदेशान्वये प्राथमिक शिक्षणासाठी केंद्र शासनाचा Ad-hoc हप्त्याचा आवर्ती (अनुसूचित जमाती उपयोजना हिस्सा (TSP)) रु.१९,५५,६६,०००/- इतका निधी मंजूर केला आहे. सदर निधीच्या प्रमाणात राज्य हिस्याचा निधी रु.१३,०३,७७,३३३/- इतका येतो. वित्त विभागाने अर्थसंकल्पिय तरतूदीच्या १५ टक्केच्या मर्यादेत निधी वितरणास मंजूरी दिली आहे. त्यानुसार आदिवासी विकास विभागाने संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये (२२०२ आय ६४८) केंद्र हिस्सा, ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली रु.१०८९.६६ लाख व (२२०२ आय ६५७) राज्य हिस्सा, ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली रु.५०० लाख इतका निधी वितरीत केला आहे.

महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. वित्त विभागाच्या दि.१८/०५/२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या सुचनेनुसार केंद्र शासनाने दि.०५/०८/२०२० रोजीच्या पत्रान्वये मंजूर केलेला अनुसूचित जमाती उपयोजनेचा रु.१९,५५,६६,०००/- इतका निधी प्रत्यक्षात राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाला असल्याचा वित्त विभागाचा दि.०४/०९/२०२० रोजी ई-मेल प्राप्त झाला आहे. त्यानुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

**शासन निर्णय:-**

केंद्र शासनाने उपरोक्त प्रमाणे प्राथमिक शिक्षणासाठी उपलब्ध करुन दिलेला निधी खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्याकडे समग्र शिक्षा कार्यक्रमाच्या (प्राथमिक शिक्षण) च्या अंमलबजावणीसाठी या आदेशान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर विवरणपत्रातील स्तंभ क्र.४ येथील वितरीत करावयाची तरतूद स्तंभ क्र.२ येथील लेखाशिर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

| अ. क्र. | लेखाशिर्ष | सन २०२०-२१ या वर्षात अर्थसंकल्पिय तरतूद | वितरीत करावयाची तरतूद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | "मागणी क्रमांक टी-५, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१) (१०) समग्र शिक्षा अभियान (अनुसूचित जमाती उपयोजना (TSP), (केंद्र हिस्सा ६० टक्के), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२०२I६४८)" | रु.१७५ कोटी | रु.१०,८९,६६,०००/- **प्राथमिक शिक्षण** |
| २ | "मागणी क्रमांक टी-५, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१) (११) समग्र शिक्षा अभियान (अनुसूचित जमाती उपयोजना (TSP), (राज्य हिस्सा ४० टक्के), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२०२I६५७)" | रु.१०० कोटी | रु.५,००,००,०००/- **प्राथमिक शिक्षण** |
| | | **एकूण** | **रु.१५,८९,६६,०००/-** |

**२.** वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दि.१६/०४/२०२० व शासन निर्णय, दि.०४/०५/२०२० मधील नमूद केलेल्या सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

**३.** सदर शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाचे दि.०५/०८/२०२० रोजीच्या आदेशामध्ये दिलेल्या निदेशानुसार व सन २०२०-२१ च्या वार्षिक कार्ययोजना व अंदाजपत्रक प्रकल्प मान्यता मंडळाने (PAB) मंजूर केलेल्या समग्र शिक्षा अंतर्गत प्राथमिक शिक्षणाच्या चालू योजनांच्या आवर्ती खर्चासाठी खर्च करावा.

**४.** खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

**५.** अनुसूचित जमाती या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय /उप लेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ.माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; आदिवासी विकास विभाग व शालेय शिक्षण विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

६. आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

७. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तीक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

८. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१६/०४/२०२० चे परिपत्रक व शासन निर्णय दि.०४/०५/२०२० मधील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरित करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव / कक्ष अधिकारी (लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरित करुन निधी समग्र शिक्षा यांच्या बँक खात्यात जमा करावा.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे संदर्भाधिन दि.१६/०४/२०२० चे परिपत्रक व शासन निर्णय दि.०४/०५/२०२०, वित्त विभागाचा दि.०४/०९/२०२० रोजीचा ई-मेल तसेच आदिवासी विकास विभागाचा दि.२८/१०/२०२० रोजीचा शासन निर्णय व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.५२१/व्यय-१४, दि.१२/१०/२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०३१२५८१७४९२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2020.11.03 13:04:28 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
३) मा.राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
४) मा. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
५) मा.प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
७) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई

८) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१०) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ६३
११) सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
१२) अधिदान व  लेखा कार्यालय, मुंबई
१३) उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) वित्त विभाग(व्यय-१४ / अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१५) अवर सचिव, लेखा शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) निवड नस्ती (एस.डी.१).